तातडीचे

शासकीय कर्मचाऱ्यांच्या डिसेंबर, १९७७ ते फेब्रुवारी, १९७८ ह्या संपाच्या काळात काम केलेल्या कर्मचाऱ्यांना वर्ग-३ व वर्ग-४ च्या सेवांमध्ये पर्यायी नोकऱ्या देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक-एसटीके-१०९१/सीआर-३५/१६-अ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २८ ऑगस्ट, १९९१.

वाचा: १] शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-एसटीके-१०७८/७१८/४११/१६-अ, दिनांक ११/५/७८.
२] शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-एसटीके-१०८३/सीआर-३८/१६-अ, दिनांक २१/९/८३.

## प रि प त्र क

राज्य शासकीय कर्मचाऱ्यांच्या डिसेंबर, १९७७ ते फेब्रुवारी, १९७८ ह्या संपकाळात काम केलेल्या संपकालीन कर्मचाऱ्यांना शासन सेवेत वर्ग-३ व वर्ग-४ च्या पदावर तात्पुरत्या नियुक्तीसाठी पसंतीक्रम देण्याबाबत धोरण वरील आदेशानुसार निश्चित केलेले आहे. त्यानुसार अशा संपकालीन कर्मचाऱ्यांच्या प्रतीक्षा याद्या संबंधित जिल्हाधिकाऱ्यांनी ठेवलेल्या आहेत. चतुर्थश्रेणीतील पदे भरताना तसेच तृतीय श्रेणीतील तात्पुरत्या नेमणुका ज्या महाराष्ट्र लोकसेवा आयोग/प्रादेशिक निवड मंडळामार्फत करावयाच्या नसतील त्यावर नेमणुका करताना, [ह्यामध्ये रजा रिक्त पदे, अल्प कालावधीची पदे तसेच आयोग पुरस्कृत/प्रादेशिक निवड मंडळाकडील कर्मचारी उपलब्ध होईपर्यंत अंतरिम व्यवस्था म्हणून करावयाच्या नेमणुका ह्यांचा समावेश होईल] प्रचलित पद्धतीनुसार, अतिरिक्त संवर्ग कक्षातील उमेदवार उपलब्ध नसल्याची खात्री केल्यावर संपकालीन कर्मचाऱ्यांच्या प्रतीक्षा यादीवरील संपकालीन कर्मचाऱ्यांची मागणी करण्याबाबत सूचना ह्यापूर्वी देण्यात आलेल्या आहेत.

२. संपकालीन कर्मचाऱ्यांना वर दर्शविल्याप्रमाणे तात्पुरत्या नियुक्त्यांसाठी पसंतीक्रम देण्याबाबत शासनाचे धोरण अद्याप कायम असताना, काही कार्यालयांकडून संपकालीन कर्मचाऱ्यांची मागणी करण्यात येत नाही व त्यांच्या तात्पुरत्या नेमणुकांसाठी तसेच जी पदे लोकसेवा आयोग व निवड मंडळाच्या कक्षेत येत नाहीत अशा पदांवर नेमणुका करताना विचार केला जात नाही. असे

शासनाच्या निदर्शनास आणण्यात आले आहे. तरी सर्व नियुक्ती अधिकाऱ्यांना असा सूचना देण्यात येत आहेत की, दर. वर्षीच्याप्रमाणे तात्पुरत्या स्वरूपात नेमणुका करताना संबंधित जिल्हाधिकाऱ्यांकडून प्रतीक्षा यादीवरील अंशकालीन कर्मचाऱ्यांची मागणी करण्याबाबतच्या पूर्वीच्या आदेशाचे काटेकोरपणे पालन करावे. तृतीय श्रेणीतील नियमित स्वरूपाच्या नेमणुकांसाठी मात्र अंशकालीन कर्मचाऱ्यांना पूर्वीप्रमाणेच महाराष्ट्र लोकसेवा आयोग/प्रादेशिक निवड मंडळे यांच्यामार्फत यावे लागेल.

३. जिल्हाधिकाऱ्यांकडील अंशकालीन कर्मचाऱ्यांच्या प्रतीक्षा याद्या अद्ययावत करण्याबाबत सूचना सर्व जिल्हाधिकाऱ्यांना दिनांक २/३/९१ रोजी देण्यात आलेल्या आहेत. त्यानुसार प्रतीक्षा याद्या अद्ययावत करण्याबाबत कार्यवाही काही जिल्ह्यामध्ये पूर्ण करण्यात आलेली आहे. ज्या जिल्ह्यांमध्ये याद्या अद्ययावत करण्याबाबत कार्यवाही पूर्ण झालेली नसेल त्यांनी हे काम तातडीने पूर्ण करावे व कार्यालयांच्या मागणीनुसार तात्पुरत्या नियुक्तीसाठी अंशकालीन कर्मचाऱ्यांच्या शिफारशी करण्यात याव्यात, अशा सूचना सर्व जिल्हाधिकाऱ्यांना देण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) सर्व मंत्रालयीन विभाग,
२) सर्व विभागीय आयुक्त,
३) सर्व जिल्हाधिकारी,
४) सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
५) मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख/ कार्यालय प्रमुख.